**राजपत्रित राज्य शासकीय अधिका-यांना**
**नवीन मोटार कार खरेदी करण्यासाठी**
**अग्रिम मंजूर करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक -अग्रिम-२०१०/प्र.क्र. २६/१०/विनियम
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक - १७ जुलै, २०१०**

**पहा:-(१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-अग्रिम-१०९९/प्र.क्र.१६/९९/विनियम, दिनांक १० मार्च, २०००.**
**(२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- अग्रिम-१०.०५/प्र.क्र.१८/२००५/विनियम, दिनांक २० जून २००५**
**(३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८, दिनांक १५ मे, २००९**
**(वित्तीय अधिकार प्रदान करणेसंदर्भात)**

प्रस्तावना:- शासन अधिसूचना वित्त विभाग, क्रमांक:वेपुर-१२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दि. २२ एप्रिल, २००९ अन्वये राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनश्रेणी दिनांक १ जानेवारी, २००६ पासून सुधारित करण्यात आल्या आहेत. या सुधारित वेतन संरचनेतील वेतन बँड मधील वेतन (Pay in the Pay-Band) विचारात घेऊन, राजपत्रित राज्य शासकीय अधिका-यांना नवीन मोटार कार खरेदी करण्यासाठी अग्रिम मंजूर करताना, संदर्भाधिन शासन निर्णय, वित्त विभाग, दि.२० जून २००५ अन्वये विहित केलेली वेतन मर्यादा सुधारित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. यासंदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय**

नवीन मोटार कार खरेदीसाठी राजपत्रित राज्य शासकीय अधिका-यांना मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील नियम १३६ आणि संदर्भाधिन अ.क्र.३ येथील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक, अ.क्र.१२, नियम क्र.१३६ मधील अटींच्या अधीन सुधारित वेतन मर्यादेनुसार खालीलप्रमाणे अग्रिम मंजूर करण्यात यावा:-

नवीन मोटार कार खरेदी करण्यासाठी अग्रिम :-

(१) ज्या राजपत्रित राज्य शासकीय अधिका-यांचे वेतन-बँड मधील मासिक वेतन रु.१९५३०/- (ग्रेड वेतन वगळून) किंवा अधिक आहे अशा राजपत्रित अधिका-यांना या प्रयोजनार्थ अग्रिम अनुज्ञेय राहील.
(२) वेतन बँडमधील मासिक वेतनाच्या ८ पट एवढी रक्कम किंवा रु.१,८०,०००/- (रुपये एक लक्ष ऐंशी हजार फक्त) किंवा नवीन मोटार कारची प्रत्यक्ष किंमत यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढा अग्रिम अनुज्ञेय राहील.
(३) अग्रिमाची वसूली करताना प्रथमत: मुद्दलाची १०० समान मासिक हप्त्यात वसूली करावी व त्यानंतर व्याजाची वसूली ६० मासिक हप्त्यांमध्ये करावी. मात्र एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्यांचे १६० महिने पूर्ण होण्यापूर्वीच सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

ROTA/H 1685 (4500+30-7-2010)

२. नवीन मोटार कार खरेदी करण्यासाठी अग्रिम खालील अटींच्या अधिन अनुज्ञेय राहील:-

(१) अग्रिमासाठी अर्ज करणा-या अधिका-यांची सेवानिवृत्तीपूर्वी व्याजासह संपूर्ण अग्रिम रक्कम परतफेड करण्याची क्षमता असल्याची, अग्रिम मंजूर करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-याने अग्रिम मंजूरीपूर्वी खात्री करावी.

(२) मोटार वाहन चालविण्यासाठी सक्षम अधिका-यांकडून मिळालेल्या अनुज्ञाप्ती (LICENCE) ची छायाप्रत (झेरॉक्स) सादर करावी.

(३) नवीन खरेदी करावयाच्या मोटार कार च्या उत्पादनाचे वर्ष, खरेदीची तारीख व त्या संदर्भाचे नोंदणीचे कागदपत्र सादर करण्यात यावेत.

(४) शासकीय विमा निधीकडे नवीन मोटार कारचा विमा उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची दक्षता घेण्यात यावी.

(५) सदर अग्रिमावर शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या दराने व्याज आकारण्यात यावे.

(६) मोटार कार ज्या महिन्यात खरेदी केली असेल, त्याच्या पुढील महिन्यापासून अग्रिमाच्या वसूलीस सुरुवात करण्यात यावी.

(७) अग्रिम धारकाने मोटार कार अग्रिम मंजूरीच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत मोटार कार खरेदी करावी व त्यासंबंधीची कागदपत्रे शासनास सादर करावीत. तसे न केल्यास अग्रिम धारकाकडून अग्रिमाची संपूर्ण रक्कम एक महिन्यानंतर दंडनिय व्याजासह एक रकमी वसूल करण्यात यावी.

(८) गहाण खतामध्ये मोटार कारचा मेक (Make), मॉडेल(Model) आणि चेसिस क्रमांक (Chassis No,) स्पष्टपणे नमूद करण्यात यावा.

(९) अर्जदाराने आवश्यक बाबींची पुर्तता केल्यानंतर सक्षम प्राधिकारी, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ अनुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराप्रमाणे मोटार कार अग्रिम मंजूर करु शकतील. असे अग्रिम मंजूर केल्यानंतर मंजूरी आदेशाची प्रत इतर सर्व संबंधित लेखापरीक्षा अधिकारी व वित्त विभाग (विनियम कार्यासन) ला पाठवावी.

(१०) अग्रिम मंजूर करताना मुंबई वित्तीय नियम-१९५९ मधील नियम १२४ (बी) व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कार्यालयीन आदेशांप्रमाणे लागू ठरणा-या दंडनिय व्याजाचा उल्लेख मंजूरीच्या आदेशात करण्यात यावा.

(११) मोटार कार अग्रिमाची व्याजासह पूर्ण परतफेड होईपर्यंत, मोटार कार शासनाकडे गहाण राहील. त्यासाठी संबंधित अधिका-यांस विहित नमुन्यात व कार्यपध्दतीप्रमाणे गहाणखत भरुन देणे आवश्यक राहील. नवीन मोटार कार करिता अग्रिम धारकाकडून नियमानुसार आवश्यक ते विहित नमुन्यातील करारपत्र (नमुना २०), गहाण बंधपत्र (नमुना २१) व दुय्यम बंधपत्र (नमुना-२२) घेण्यात यावीत.

३. नवीन मोटार कार अग्रिम मंजूरीसाठी आवश्यक असलेल्या निधीसाठी प्रत्येक प्रशासकीय विभागाने पुढील लेखाशिर्षाखाली वित्त विभागातील अर्थसंकल्प कक्षाच्या मान्यतेने आवश्यक अर्थसंकल्पिय तरतूद करावी व त्यानंतरच अग्रिम मंजूर करावा.

प्रधान लेखाशीर्ष :- ७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे.

गौणशीर्ष :- २०२, मोटार वाहन खरेदीसाठी अग्रिमे

४. यापूर्वी निर्गमित करण्यात आलेला संदर्भाधिन दिनांक १० मार्च,२००० चा शासन निर्णय निष्प्रभावीत करुन तसेच दि.२० जून २००५ च्या शासन निर्णयातील मोटार कार अग्रिमाबाबत सुधारणा करुन, सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. मुंबई वित्तीय नियम-१९५९ मधील संबंधित नियम १३६ मध्ये आवश्यक ती सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

६. हा शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.ln या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००७१७१९२८२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अ.अ.कोदे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

- प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई २०
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई २०
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
- महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व विधानमंडळ सदस्य, विधान भवन, मुंबई.
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव
मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई

- प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
- प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
- प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद
- प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
- प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
- प्रमुख न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, नागपूर / मुंबई, वांद्रे, मुंबई - ४००० ०५१
- विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली .

उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती

- आयुक्त,राज्य माहिती आयोग (सर्व)

उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, मुंबई/कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई /पुणे/ नागपूर/ औरंगाबाद / नाशिक/ अमरावती
सर्व उप कोषागार अधिकारी
मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
महाराष्ट्र राज्य महिला आयोग, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई-५१
संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
बहूजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०.
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५
नॅशनलस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-२१.
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८,
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

- पत्राद्वारे.

H 1685 - 2